**नोंदणी व मुद्रांक विभागातील सह जिल्हा निबंधक व दुय्यम निबंधक कार्यालयां विषयीच्या तक्रारींचे निरसनासाठी जिल्हास्तरीय व्यवस्थेबाबत......**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक : आस्थाप-२०१९/३९७८/ प्र.क्र.०२/म-१**

दालन क्र.म-७अ, पोटमाळा, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार इमारत), मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०९ मार्च, २०२०.

**संदर्भ क्र.** १) शासन परिपत्रक,क्र. आस्थाप-२०१९/३९७८/म-१,दि.०६.०२.२०१९

<u>प्रस्तावना</u> :

नोंदणी व मुद्रांक विभागातील आपले सरकार पोर्टल अथवा इतर माध्यमातून जिल्हाधिकारी यांच्याकडे सह जिल्हा निबंधक किंवा दुय्यम निबंधक कार्यालयांच्या कामकाजाविषयी तक्रार / सूचना प्राप्त झाल्यास, सदर तक्रारींचे निरसन करण्यासाठी जिल्हास्तरीय व्यवस्थेबाबत या विभागाचे शासन परिपत्रक दि.०६.०२.२०१९ अन्वये सूचना देण्यात आल्या आहेत.

मा.कॅबिनेट सचिव,भारत सरकार यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या आढावा बैठकीच्या अनुषंगाने मा.मुख्य सचीव,महाराष्ट्र राज्य यांनी दिलेल्या निर्देशानुसार मुंबई शहर जिल्हा व मुंबई उपनगर जिल्हा या जिल्ह्यांमधील सह जिल्हा निबंधक किंवा दुय्यम निबंधक कार्यालयांच्या कामकाजाविषयी तक्रार / सूचना प्राप्त झाल्यास, सदर तक्रारींचे निरसन अतिरिक्त महानगर पालिका आयुक्त,बृहन्मुंबई महानगर पालिका यांच्या स्तरावर करण्यात येणे आवश्यक आहे.तथापि, प्रस्तुत प्रकरणाच्या अनुषंगाने प्रशासकीय निकड,प्रशासकीय संलग्नत व कार्यसुलभता विचारात घेता मुंबई शहर जिल्हा व मुंबई उपनगर जिल्हा या जिल्ह्यांमधील सह जिल्हा निबंधक किंवा दुय्यम निबंधक कार्यालयांच्या कामकाजाविषयी तक्रार / सूचना प्राप्त झाल्यास, शासन परिपत्रक दि.०६.०२.२०१९ मधील तरतुदींनुसार सदर तक्रारींचे निरसन करण्याबाबतची कार्यवाही विभागीय आयुक्त (कोकण विभाग) यांच्यास्तरावर केल्यास उचित होईल.

यानुषंगाने उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील दि.०६.०२.२०१९ च्या परिपत्रकामधील तरतुदींनुसार मुंबई जिल्हा व मुंबई उपनगर जिल्हा या दोन जिल्ह्यांमधील तक्रारींचे निरसन करण्याच्या कार्यवाहीबाबत सुधारित आदेश निर्गमित करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक** :

मुंबई शहर जिल्हा व मुंबई उपनगर जिल्हा या जिल्ह्यांमधील सह जिल्हा निबंधक किंवा दुय्यम निबंधक कार्यालयांच्या कामकाजाविषयी तक्रार / सूचना प्राप्त झाल्यास, शासन परिपत्रक दि.०६.०२.२०१९ मधील तरतुदींनुसार सदर तक्रारींचे निरसन करण्याबाबतची कार्यवाही विभागीय आयुक्त(कोकण विभाग) यांच्यास्तरावर करण्यात येईल.

सदरचे आदेश या शासन परिपत्रकाच्या दिनांकापासून अंमलात येतील.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००३०९१७५००३८२१९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Tanaji Dhondiram Saravane
Date: 2020.03.09 17:53:35 +05'30'

**( ता. धों. सरावणे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक,महाराष्ट्र राज्य,पुणे.

**प्रत,**

१) सर्व जिल्हाधिकारी तथा जिल्हा निबंधक,महाराष्ट्र राज्य.

२) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचीव,मंत्रालय,मुंबई-३२

३) मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई-३२

४) अपर मुद्रांक नियंत्रक,प्रधान मुद्रांक कार्यालय,मुंबई.

५) सर्व नोंदणी उपमहानिरीक्षक,नोंदणी व मुद्रांक विभाग.

६) निवडनस्ती ,म-१ कार्यासन,महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.